महाराष्ट्र इलेक्ट्रिक वाहन धोरण-२०२१ अंतर्गत पायाभूत चार्जिंग व्यवस्था निर्मितीसाठी प्रोत्साहने वितरीत करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : धोरण-२०२२/प्र.क्र. ११३/ऊर्जा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०३ जूलै, २०२३

**वाचा:-** १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्रमांक इएलडी-२०१८/प्र.क्र.४/ ऊर्जा-१, दिनांक २१.०२.२०१९.
२) पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, शासन निर्णय क्रमांक मइवाधो-२०२१/ प्र.क्र.२५/तां.क.४, दिनांक २३.०७.२०२१.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्रमांक लेखाशि-२०२१/प्र.क्र.६०/ ऊर्जा-१, दिनांक ०९.१२.२०२१.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,शासन निर्णय क्रमांक धोरण-२०२२/प्र.क्र. ११३/ऊर्जा-५, दिनांक २२.०६.२०२२
५) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं- २०२३/प्रक्र-४०/अर्थ-३ दि.१२.०४.२०२३
६) महावितरण कंपनीचे पत्र क्र. CMD/MSEDCL/NO १८७२६ दि.२१.०६.२०२३

**प्रस्तावना-**

इलेक्ट्रिक वाहनांसाठी राज्यात चार्जिंगच्या सुविधा पुरविण्याकरिता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई (महावितरण) या कंपनीला दिनांक २१ फेब्रुवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये राज्य नोडल एजन्सी म्हणून नियुक्त करण्यात आले आहे. पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाने दि. २३ जुलै, २०२१ च्या शासन निर्णयान्वये “महाराष्ट्र इलेक्ट्रीक वाहन धोरण, २०२१” जाहीर केले आहे. सदर धोरण हे दिनांक ३१ मार्च, २०२५ पर्यंत राज्यामध्ये राबविण्यास मान्यता दिली आहे. सदर शासन निर्णयामध्ये मुद्दा क्र.२.४.२ नुसार पायाभूत चार्जिंग व्यवस्था निर्मितीसाठीची प्रोत्साहने ऊर्जा विभागामार्फत देण्यात येणार असल्याचे नमुद केले आहे. त्यानुसार पायाभूत चार्जिंग सुविधांची प्रोत्साहने वितरीत करण्यासाठी महावितरणच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने महावितरणला निधी उपलब्ध करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन असून सद्यस्थितीत BEAMS प्रणालीवर या प्रयोजनार्थ रु. ७.९० कोटीच्या १०% च्या मर्यादेत निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. त्यानुसार आता रुपये ७९ लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र इलेक्ट्रीक वाहन धोरण २०२१ अंतर्गत पायाभूत चार्जिंग व्यवस्था निर्मितीसाठीची प्रोत्साहने देण्याकरिता महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई (महावितरण) यांना रुपये ७९,००,०००/- (रु. एकोणऐंशी लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री.नारायण श्री. कराड, उप सचिव (ऊर्जा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व डॉ. गौरी पाटील, कार्यासन अधिकारी, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर निधी अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या; यांच्या नावे अदा करण्यात यावा. आदेशामधील व वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या परिपत्रकामधील विहित केलेल्या निकषांची पुर्तता झाल्यानंतर संबधीतांना निधी वितरण करण्याची जबाबदारी अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महावितरण यांची राहील, या अटिच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या निधीची रक्कम केवळ पायाभूत चार्जिंग व्यवस्था निर्मितीसाठीची प्रोत्साहने देणेबाबतच्या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात येईल याची खातरजमा करण्यात यावी. सदर निधी खर्च करण्यापूर्वी संबंधीत प्रकल्पांना सक्षम प्राधिकाऱ्यांकडून प्रत्यक्ष खर्चाच्या अनुषंगाने प्रशासकीय व तांत्रिक मान्यता घेण्यात यावी. विहित कालावधीत निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता महावितरणकडे पडून राहिल्यास त्याची संबंधितांवर जबाबदार निश्चित करावी. मान्य व अनुज्ञेय काळात खर्च करण्याची जबाबदारी अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महावितरण यांची राहील. याबाबतचा त्रैमासिक अहवाल न चुकता सादर करण्याची जबाबदारी लेखाविषयक बाबी हाताळणाऱ्या संचालक (लेखा) म्हणून कार्यभार पाहणाऱ्या अधिकाऱ्यावर टाकण्यात यावी. उक्त नमूद योजनेवरील खर्चाचा, उद्दिष्टे व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास सादर करण्यात यावा.

५. या विभागाच्या "**मागणी क्र. के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १९९ इतर अशासकीय संस्थाना सहाय्य, (०१) इलेक्ट्रिक वाहन धोरण, (०१)(०१) चार्जिग व्यवस्था निर्मितीसाठी प्रोत्साहन (२८०१५७०३), ३३ अर्थसहाय्य**" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२३०७०३१५४३३७७५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT PUNDLIK BADGERI

Digitally signed by PRASHANT PUNDLIK BADGERI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, pseudonym=AC7259A119539CB47009F7E30F693EAB895718AB, serialNumber=EC955E2D360E1FDDB6ABAC58A907419053BEECEB5DBAC48A78C89C588FF71BEF, cn=PRASHANT PUNDLIK BADGERI
Date: 2023.07.03 15:46:59 +05'30'

**( प्र. पुं. बडगेरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा यांचे खाजगी सचिव,विधानभवन, मुंबई
५. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
१०. महालेखापाल (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१३. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या; प्रकाशगड, वांद्रे (पू), मुंबई- ५१.
१४. वित्त विभाग (व्यय-१६/अर्थ-१४) मंत्रालय, मुंबई-३२.
१५. नियोजन विभाग (कार्यासन १४११/१४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
१६. अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१७. कक्ष अधिकारी (रोख शाखा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
१८. कक्ष अधिकारी (प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९. निवड नस्ती (ऊर्जा-५).